# आजोबांचे हॉटेल

मूळ लेखक : रिकी लेविन्सन

चित्रे : डेविड सोमन

मराठी अनुवाद : तृप्ती कर्णिक



उन्हाळा सुरु झाला की आईसोबत आम्ही भावंड डोंगराच्या कुशीत वसलेल्या आजोबांच्या हॉटेलमध्ये राहायला जायचो.

हॉटेलची भली मोठ्ठी इमारत होती. प्रत्येक खोलीच्या बाहेर ऐसपैस जागा होती. त्या मोकळ्या जागेत भरपूर डूलत्या आरामखुर्च्या ठेवल्या होत्या. संपूर्ण इमारत पांढरीशुभ्र होती.

हॉटेलच्या जवळच झाडांनी वेढलेलं सोनेरी पिवळ्या रंगाची छोटीशी बंगली होती. हे आमचं, आम्हा सर्वांचं घर. इथे आम्ही सगळी चुलत भावंडं, काका-काकी एकत्र झोपायचो.



मला तेरा चुलत भावंडं होती आणि माझ्या तीन काक्यांना लवकरच बाळ होणार होती, त्यामुळे माझ्या भावंडामध्ये अजून वाढ होणार होती.

“आई, तुला बाळ होणार आहे का?” मी विचारलं.

“मला? आणि बाळ?” आई म्हणाली.

“जर तुला बाळ झालं तर एल्बी, नेडी आणि मी धरून आम्ही वीस भावंडं पुढच्या उन्हाळ्याच्या सुट्टीत हॉटेलमध्ये एकत्र राहायला असू.” मी म्हणालो. “कसलं भारी होईल नं?”

“एकोणीस भावंडं भरपूर आहेत बेटा," आई म्हणाली.

“पण मला वीस हवी आहेत,” मी आईच्या गळ्यात पडून म्हणाले.





मला माझ्या सगळ्या बहिण-भावांसोबत राहायला खूप आवडायचं. हॉटेलमध्ये तर अजूनच. कारण इकडे दिवसरात्र आम्ही एकत्र असायचो. रोज सकाळी नाश्ता झाला की आज काय करायचं हे घराच्या पुढल्या पायऱ्यावर बसून आम्ही ठरवायचो.

आम्ही तिकडे “लीडर लीडर” खेळायचो. मी जेव्हा लीडर असायचे तेव्हा तर मला हा खेळ खूपच आवडे. कधी कधी हिरवळीवर आम्ही बॉलने सॉफ्टबॉल आणि क्रॉकी खेळायचो तेव्हा छोटे टॅमी आणि झिगी आमच्या खेळाच्या मधून पूर्ण मैदानावर पळत राहायचे. पण मी ते खपवून घ्यायचे कारण मीही लहानपणी तसंच केलं होतं.



खूपच गरम होत असेल त्यादिवशी आम्ही जवळच्या तळ्यात पोहायला जायचो. मज्जा म्हणून आम्ही एकमेकांच्या अंगावर पाणी उडवायचो. अशावेळी छोटे टॅमी आणि झिगी मात्र पळून जायचे.

पाहुणे जेव्हा डायनिंग रूममधे जेवायला बसायचे तेव्हा आम्ही त्यांच्या खोलीबाहेरच्या डुलणाऱ्या आरामखुर्च्यांमध्ये बसायचो. आरामखुर्ची खाली वर करत आम्ही खूप वेळ डुलत रहायचो.

तसं तर आम्ही रोजच खूप मस्ती आणि धमाल करायचो पण रविवारचा दिवस आमच्यासाठी अगदी खास असायचा.

रविवारी सकाळी लवकर उठून आम्ही घराबाहेर पळायचो आणि शर्यंत लावायचो. दवाने ओल्या झालेल्या गवतातून मी सर्वात पुढे धावत जाऊन टेकडीवर चढायचे आणि पहिला नंबर असं जोरात ओरडायचे. सगळेजण माझ्यामागून हसत-खिदळत वर पोहचायचे.



नंतर आम्ही झाडांच्या खाली दगडांवर उड्या मारत कसरती करत खाली उतरायचो. आणि जोरात चला..हटा..शू..शू....असं ओरडत कोंबड्यांच्या खुराड्यात शिरायचो.

आमच्या गडबड-गोंगाटाने कोंबड्या घाबरून उडून जायच्या. मग चपळाईने आम्ही त्यांची अंडी पळवून दगडी बेकरीच्या दिशेने धूम ठोकायचो.

व्वा, कसला मस्त वास यायचा! विटांच्या भट्टीत ब्रेड भाजायला टाकलेला असायचा. ट्रे ताज्या मफीन आणि रोलनी भरलेले असायचे. आम्ही ते खायला घ्यायचो तेव्हा बेकरीवाला फक्त हसायचा कारण आम्ही त्याच्या मालकाची नातवंड होतो ना!

तिकडून मग दगडी पायऱ्या उतरून आम्ही स्वयंपाकघरात प्रवेश करायचो.

आजी आमची वाट पाहत उभीच असायची. “आलात का बाळानो...या, या,” असं प्रेमाने स्वागत करत आम्हा सगळ्यांना ती जवळ घ्यायची. आमच्याजवळची अंडी तिला दिली की ती हसून आमचे मुके घ्यायची.

आजी जेव्हा मला तिच्या जवळ घ्यायची तेव्हा तिच्या अंगाचा छान सुगंध यायचा. आई आणि मी नुकतेच धुऊन वाळलेल्या कपड्यांच्या घड्या घालायचो तेव्हा अगदी असाच सुगंध यायचा.

.



जेवण्याच्या टेबलापाशी बसलो की सगळे एकाचवेळी आपसात बोलायला लागायचे. नुसता गडबड गोंधळ असायचा. आजीला ते फार फार आवडे. ती मोठ्या चुल्ह्याजवळ अंडी उकडत असायची आणि तिचा चेहरा आनंदाने उजळून निघालेला दिसायचा.



नाश्ता तयार झाला की आजी टेबलाभोवती फिरून आम्हा सगळ्यांना वाढायची. तिची सोळा नातवंड एकत्र खाताना पाहून ती डोळे बारीक करत तोंड भरून हसायची.



दर रविवारी पाहुण्यांची दुपारची जेवणं झाली की आम्ही घरचे सगळे जण मोठ्या जेवण्याच्या टेबलावर एकत्र जेवायला बसायचो. आजोबा टेबलाच्या मध्यस्थानी असलेल्या खुर्चीवर बसायचे आणि आजी त्यांच्या शेजारी. दोघेही माझ्याकडे आणि प्रत्येकाकडे मान वळवून स्मितहास्य करायचे.



आजोबा हात उंचावून आम्हाला शांत राहायला सांगायचे. “हर्बी, तुला काही सांगायचे आहे का?“ ते विचारीत.
“हो बाबा. इकडे कुटुंबातील सगळेजण इतके दिवस एकत्र आले तर आपल्याला नफा कसा होणार?” हर्बकाका म्हणाले. ते ऑफिसचं सगळं काम पाहायचे.



“सगळ्यांनी एकत्र येणं ह्यापेक्षा नफा महत्वाचा आहे का?” आजोबा गालातल्या गालात हसत विचारायचे. हर्बकाका त्यावर नाही ह्या अर्थाने मान हलवीत.

“आपल्याकडे आता थोडेच मटण शिल्लक राहिलं आहे कारण मुलांना ते खूप आवडतं,” जेककाका म्हणाले. त्यांच्याकडे हॉटेलच्या किचनची जबाबदारी होती.



“आपल्या नातवंडाचे खाण्यापिण्याचे लाड आपण नाही करणार तर अजून कोण करणार,” आजी म्हणाली.
त्यावर जेककाकांनी मान डोलावली. मग आजी-आजोबांच्या हसण्यामध्ये आम्ही काही मुलंही सहभागी होत.



“आपल्याला जास्तीचा सोडा मागवावा लागेल. मुलं सारखी सोडा पित असतात. मूकाका म्हणाले. ते पेयविभाग सांभाळीत.

“जास्तीच्या कॅन्डीही लागतील,”, बेनकाका म्हणाले. लॉबीमधली कॅन्डीची गाडी ते पाहायचे.

“अरे,” दाढी कुरवाळत आजोबा म्हणत, “मुलांपेक्षा मधुर असं ह्या जगात दुसरं काही नाही.”

त्यावर बेनकाका आणि मूकाका आम्हा मुलांकडे नजर फिरवायचे आणि आमच्या खिदळण्यात सहभागी होऊन जायचे.



“बाबा, त्यापेक्षा आपण हे हॉटेल विकून सगळे घरातच बसुयात का?” बेस्सीकाकी म्हणाली. “आपले बरेच पैसे वाचतील.”

“म्हणजे मग उन्हाळ्यात सर्वांनी इथे एकत्र येणं थांबेल, नाही का?” आजी चिडून म्हणाली, “तुझा धिक्कार असो,”

“ठीक आहे, ठीक आहे,” टेबल वाजवत हर्बकाका म्हणाले. “आपण जर मनोरंजनासाठी असलेल्या माणसांना पगार नाही दिला तर बाबा आपले थोडे पैसे वाचतील.”



"पैसे? पैसे? कोण देतंय?“ आईने विचारलं. कॅसिनोची जबाबदारी ती सांभाळत असे. “आपल्या योसेलचा किती मधुर आवाज आहे..आणि गोल्डबर्गस..त्या अप्सरेसारख्या सुंदर नृत्य करतात! आणि आपले नातेवाईकच आहेत ते. त्यांचा आपल्याला काहीच खर्च नाही.”

मी हसू दाबण्याचा खूप प्रयत्न केला पण काही केल्या आवरता आलं नाही. हर्बकाका पण हसून म्हणाले, “ बाबा, काय करूयात आपण आता?”

“काय करायचं म्हणजे?“, आजोबा हसत हसत म्हणाले, “चला, सगळ्यांनी जेवायला सुरुवात करूयात.”

आई आणि मी एकमेकींकडे पाहून हसलो आणि मिठी मारली. मी टेबलावर नजर टाकली. सगळे आपापसात बोलण्यात गुंग होते. खोली आवाजाने भरून गेली होती. पण हे अगदीच चालणार होतं. हे आमचं हॉटेल होतं. आजी, आजोबा, आई किंवा मी..आमच्या कुणासाठीच हे अजिबातच मोठं कुटुंब नव्हतं.

